# महाराष्ट्र शासन

शासन परिपत्रक क्र.लवेसू-२०१०/प्र.क्र.१२५/पंरा-२
ग्रामविकास व जलसंधारण विभाग, मंत्रालय, मादाम कामा मार्ग,
हुतात्मा राजगुरु चौक, मुंबई-४०० ०३२.
दिनांक: १३ डिसेंबर, २०११

परिपत्रक:-

७३ व्या घटनादुरुस्तीनंतर ग्रामपंचायत, पंचायत समिती व जिल्हा परिषदाना ग्रामीण विकासाच्या कामासाठी मोठया प्रमाणावर अधिकार प्रदान करण्यात आले आहेत. या पंचायतीराज संस्थामधून निवडून येणाऱ्या लोकप्रतिनिधींना विविध विकास योजनांशी संबंधित आर्थिक व प्रशासकीय सनियंत्रणाची जवाबदारी पार पाडावी लागते. ग्रामपंचायत स्तरावर तर आर्थिक व्यवहार करण्याची जबाबदारी सुध्दा सरपंच व ग्रामसेवक यांना संयुक्तरित्या देण्यात आली आहे. या सर्व परिस्थितीत पंचायत राज संस्थाच्या निवडणूका पारदर्शक पध्दतीने,निप:क्षपातीपणे व चांगल्या वातावरणात होणे आवश्यक असून पंचायतराज संस्थांच्या निवडणूका स्वच्छ, निर्भय व मुक्त वातावरणात नि:पक्षपातीपणे पार पाडण्या संदर्भात क्षेत्रीय स्तरावर नियमांची काटेकोर अंमलबजावणी होणे गरजेचे असून या निवडणूका कायद्यातील तरतूदीनुसार पार पाडल्या जातील याबाबतची काळजी या निवडणूका पार पाडण्याची जबाबदारी सोपविलेल्या क्षेत्रीय अधिकाऱ्यांनी कटाक्षाने घेणे आवश्यक आहे. त्यादृष्टीने पुढील सूचना देण्यात येत आहेत: -

२.१. पंचायतराज संस्थाच्या सार्वत्रिक/पोट निवडणूका तसेच पदाधिकाऱ्यांच्या निवडणूकाबाबत महाराष्ट्र जिल्हा परिषदा व पंचायत समिती अधिनियम, १९६१ आणि मुंबई ग्रामपंचायत अधिनियम, १९५८ आणि निवडणूक नियमातील तरतूदी व त्या वेळोवेळी केलेल्या सुधारणा, त्याचप्रमाणे या संदर्भात शासनाने व राज्य निवडणूक आयोगाने वेळोवेळी दिलेल्या सूचना/आदेशांचे कटाक्षाने पालन करण्यात यावे.

२.२. या संस्थामधील मागासवर्गीयांच्या आरक्षणाची प्रचलित तरतूदीनुसार शासनाने निश्चित केलेली संख्या, गट/गण/प्रभाग रचना व तसेच चक्रानुक्रम (अनुसूचित क्षेत्र वगळून) याबाबत संबंधित अधिनियम तसेच मुंबई ग्रामपंचायत (प्रभाग रचना, आरक्षण इ. बाबत) नियम १९६६ तसेच मुंबई ग्रामपंचायत निवडणूक नियम, १९५९ मधील प्रचलित नियमांचे पालन केले जाईल याबाबत दक्षता घेण्यात यावी.

२.३. या संस्थांच्या निवडणूका/पद निवडी संदर्भात अनियमितता झाल्यासंबधीच्या तक्रारी प्राप्त झाल्यास त्याबाबतची पडताळणी तातडीने करुन त्या अनुषंगाने अनर्हतेबाबत अधिनियमातील विहीत तरतूदीनुसार करावयाच्या कार्यवाहीव्यतिरीक्त अन्य स्वरुपाची कार्यवाही आवश्यक भासल्यास त्याबाबतचा निर्णय यथास्थिती जिल्हाधिकारी/मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद यांच्या स्तरावर तातडीने घेण्यात यावा.

२.४ या संस्थांच्या निवडणूका नियमातील तरतूदीनुसार पार पाडण्याच्या दृष्टीने निवडणूक अधिकारी/पीठासिन अधिकारी व अनुषंगिक कर्मचारी नियुक्त करतांना नियमातील तरतूदी तसेच याबाबत राज्य निवडणूक आयोगाने दिलेले आदेश/ मार्गदर्शक सूचनांचे काटेकोरपणे पालन करण्यात यावे तसेच या संदर्भात संबंधित अधिकारी/कर्मचारी यांना निवडणूक प्रक्रियेचा अनुषंगाने **आवश्यक ते प्रशिक्षण देण्यात यावे.**

३. लोकशाही प्रक्रियेत निवडणूका मुक्त वातावरणात व नि:पक्षतीपणे पार पडण्यासाठी शासन यंत्रणा नि:पक्षपाती असणे अत्यंत आवश्यक असून यास्तव शासकीय अधिकारी/कर्मचारी यांच्या राजकीय स्वरुपाच्या गतिविधीमधील सहभागाच्या अनुषंगाने शासन स्तरावरुन वेळोवेळी निर्देश दिले

जातात. त्यानुसार पंचायती राज संस्थांच्या निवडणूकांमध्ये शासकीय/निमशासकीय अधिकारी/ कर्मचारी यांचा राजकीय गतिविधीमध्ये प्रत्यक्ष सहभाग सिध्द झाल्यास विभाग/कार्यालय प्रमुखांनी संबंधित वर्तणूक नियम आणि शिस्त व अपिल नियमातील तरतूदीनुसार संबंधितांविरुध्द तातडीने उचित कारवाई करावी.

४. हे शासन परिपत्रक शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेत स्थळावर उपलब्ध असुन त्यांचा संगणकीय संकेतांक २०१११२०७०५४९५५००१ असा आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

(डॉ.मल्लीनाथ कलशेट्टी)
शासनाचे उपसचिव

प्रति,

मा.राज्यपाल यांचे सचिव
मा.मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव
मा.उपमुख्यमंत्री यांचे सचिव
सर्व मंत्री/राज्यमंत्री यांचे खाजगी सचिव
सर्व विधानसभा/विधान परिषद सदस्य
मा.मुख्यसचिव यांचे स्वीय सहायक
मा.सचिव (ग्रामविकास व पंचायतराज) यांचे स्वीय सहायक
सर्व मंत्रालयीन विभाग
सर्व उपसचिव/सहसचिव, ग्रामविकास व जलसंधारण विभाग, मंत्रालय, मुंबई-४०० ०३२
सर्व विभागीय आयुक्त
सर्व जिल्हाधिकारी
सर्व जिल्हा परिषदांचे मुख्य कार्यकारी अधिकारी
उपायुक्त, राज्य निवडणूक आयोग, महाराष्ट्र राज्य
निवडनस्ती, कार्यासन क्र.पंरा-२, ग्राम विकास व जलसंधारण विभाग, मंत्रालय, मुंबई-४०० ०३२